उपसंचालक, आरोग्य सेवा (आमाजीआ),पुणे येथील जाहिरातीच्या थकित देयकास प्रशासकिय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय, क्रमांकः संकीर्ण २०२०/प्र.क्र.३०/आरोग्य- ३

१० वा मजला, गोकुलदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : ११ फेब्रुवारी, २०२०.

**वाचा :**

**१) संचालक, आरोग्य सेवा (२),आरोग्य सेवा,संचालनालय, पुणे यांचे पत्र क्रमांक- संआसे-२/उपसंचालक (आमाजीआ) पुणे/कक्ष-८५ड/भांडार/वृत्तपत्र जाहिरात/१७२०/२०, दि.२१.०१.२०२०.**

**शासन निर्णय :**

उपसंचालक, आरोग्य सेवा (आमाजीआ), पुणे या कार्यालयातील कॉम्पक्टर ही वस्तु खरेदी करण्याकरीता श्री अंबिका प्रिंटर्स आणि पब्लिकेशन्स, नवी मुंबई यांच्यामार्फत सदर वस्तुची निविदा प्रसिध्द करण्याकरीता दैनिक पुण्यनगरी या वर्तमानपत्रात जाहिरात देण्यात आली होती. सदर जाहीरात प्रसिध्द केल्याचे देयक अदा करण्याकरीता संचालनालयास सादर करण्यात आले आहे. त्या सादर केलेल्या देयकाचा तपशिल खालीलप्रमाणे आहे.

| अ.क्र. | देयकाचा तपशिल | दैनिकाचे नाव | क्रमांक व दिनांक | रक्कम |
|---|---|---|---|---|
| १. | कॉम्पक्टर खरेदीसाठी जाहीर निविदाची जाहिरात | पुण्यनगरी,पुणे | एम/११-०२/९१३३७ , दि.०९/०२/२०११ | रु.३०००/- |

२. उपरोक्त देयकात नमूद केलेल्या श्री अंबिका प्रिंटर्स आणि पब्लिकेशन्स, नवी मुंबई यांच्या रुपये रु.३०००/- (तीन हजार) इतक्या रकमेस शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक: विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि.१७.४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिनियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला,उपविभाग एक मधील अ.क्र.६ समोरील नियम क्र.४० अन्वये प्रशासकिय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तीचा वापर करुन प्रशासकिय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर देयकावर होणारा खर्च खालील लेखाशिर्षातून खर्ची घालण्यात यावा आणि हा खर्च सन २०१९-२०२० या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक-आर-१**

**२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य**
**०६ - सार्वजनिक आरोग्य,**
**८०० - इतर खर्च,८०, सर्वसाधारण,**
**००४ - आरोग्य सांख्यिकी आणि मुल्यमापन,**
**०१ - जीवनविषयक आणि आरोग्य माहितीविषयक कार्यालय खर्च**
**(२२०१ ४६२४), १३ - कार्यालयीन खर्च**

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००१२९१३४२५३७०१७ असा आहे. आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2020.02.11 11:53:57 +05'30'

**( रो.दि. कदम पाटील )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र- १/ २ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त आरोग्य सेवा, तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
३. संचालक-२, आरोग्य सेवा, पुणे.
४. उपसंचालक, आरोग्य सेवा (आमाजीआ), पुणे.
५. उप संचालक, आरोग्य सेवा मंडळ, पुणे.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, जि. पुणे.
७. निवडनस्ती (आरोग्य-३).